मुख्याधिकारी गट-ब मधुन मुख्याधिकारी
गट-अ पदावर पदोन्नती देण्याबाबत .....

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक : एमसीओ १२०९/प्र.क्र. १७७/०९/नवि १४
दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०१०

संदर्भ : १) शासन निर्णय क्रमांक एमसीओ- २०७/६५०/प्र.क्र.१६१/०७/नवि-१४, दि. ०७/४/२००८
२) शासन निर्णय क्रमांक एमसीओ-१२०७/६५०/प्र.क्र.१६१/०७/नवि-१४, दि. २०/८/२०१०

**शासन निर्णय :**

संदर्भाधिन क्र.१ च्या आदेशान्वये एकूण १४ मुख्याधिकारी यांना मुख्याधिकारी गट-ब (वेतनश्रेणी रु. ६५००-१०,५००) या वेतनश्रेणीमधून मुख्याधिकारी गट-अ (वेतनश्रेणी रु. ८,०००-१३,५००) या वेतनश्रेणीत तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ (Adhoc) पदोन्नती दिलेली आहे तसेच संदर्भाधिन क्र. २ येथील आदेशान्वये एका अधिका-यास मुख्याधिकारी गट-ब (वेतनश्रेणी रु. ६,५००-१०,५००) मधून मुख्याधिकारी गट-अ (वेतनश्रेणी रु. ८,०००-१३,५००) या गट-अ मधील वेतनश्रेणीत तदर्थ (Adhoc) स्वरुपात पदोन्नती दिलेली आहे .

०२. आता या आदेशानुसार संदर्भाधीन क्र.१ आदेशातील श्री. का. श. दिवेकर वगळता दोन्ही आदेशातील खालील मुख्याधिका-यांना गट-ब मधून गट-अ (वेतनश्रेणी रु. ८,०००-१३,५००) या वेतनश्रेणीत तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मुख्याधिकाऱ्याचे नांव | अ.क्र. | मुख्याधिकाऱ्याचे नांव |
|---|---|---|---|
| १ | श्री. शं. ब. गोरे | १२ | श्री. भा. शा.बेहेरे |
| २ | श्री. नि. ना. देसाई | १३ | श्री.सु.स. निपाणे |
| ३ | श्री. ए. एच. मुळे | १४ | श्री.दि. दि..पुजारी |
| ४ | श्री. अ. क. शेख | १५ | श्री.अ.रा. जगताप अनु.जाती |
| ५ | श्री. दे. द. टेकाळे | १६ | श्री.सु.मो. पवार |
| ६ | श्री. रा. द. कानडे | १७ | श्री. द. ग. लांघी,अ.जमाती |
| ७ | श्री. ग. नि. देशमुख | १८ | श्री.स.पा.वाघमारे अनु.जाती |
| ८ | श्री. दे. गं. पवार | १९ | श्री.गु.न.वाहुरवाघ अनु.जाती |
| ९ | श्री. च. शि. खोसे | २० | श्री. अ. आ डोंगरे अनु.जाती |
| १० | डॉ. सु. तु. जगताप | २१ | श्री. त्र्य.ब.निलावाड अनु.जमाती |
| ११ | श्री.त्र्य.दा कासार, | २२ | श्री.ज्ञा.द.ढेरे भ.ज.(क) |

०३. वरील मुख्याधिका-यांना पुढील अटींच्या अधीन राहून गट-ब मधून गट-अ मध्ये पदोन्नती देण्यात येत आहे.

अ) मा. उच्च न्यायालय,मुंबई येथील प्रलंबित रिट याचिका क्र. ८४५२/२००४ यामधील मा. उच्च न्यायालयाचे आदेश यांस अधीन राहून प्रस्तुत आदेश काढण्यात येत आहेत.

ब) पदोन्नतीसाठी पात्र मुख्याधिकाऱ्यांविरुद्ध प्रलंबित असलेली विभागीय चौकशी. (सा.प्र.वि. शासन निर्णय दि. ०२/०४/१९७६ व दि. २२/०४/१९९६ मधील तरतुदी) या मधीन निर्णयास अधीन राहून प्रस्तुत पदोन्नती देण्यात येत आहे.

क) मुख्याधिकाऱ्यांना ५०/५५ वर्षापलिकडे सेवेत ठेवण्याबाबत शासकीय आदेशानुसार करावयाची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल व त्यातील निर्णय संबधितांवर बंधनकारक राहील.

ड) कोणत्याही मुख्याधिकाऱ्यांस कोणत्याही कारणास्तव मानीव दिनांक मिळाल्यास अथवा आरक्षणामुळे सेवा ज्येष्ठतेत अथवा ज्येष्ठता सुचीत बदल झाल्यास कनिष्ठतम मुख्याधिका-यास कोणतीही पूर्व सूचना न देता गट-ब पदावर पदावनत करण्यात येईल.

ई) या पदोन्नत्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सदर निवडसूचीस मान्यता देण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

फ) परिच्छेद '२' मधील श्री. ग. नि. देशमुख आणि सु. स. निपाणे यांना दिलेली पदोन्नती ही त्यांचे विरुद्ध असलेल्या विभागीय चौकशीच्या अधीन राहून देण्यात येत आहे. श्री. ग. नि. देशमुख आणि श्री. सु. स. निपाणे यांना सदर प्रकरणी शिक्षा झाल्यास ती वरील पदाच्या वेतनश्रेणीत भोगण्यास तयार असल्याबाबतचे लेखी संमतीपत्र घेऊन पदोन्नती देण्यात येत आहे.

०४. पदोन्नती मिळालेले सर्व मुख्याधिकारी सध्या कार्यरत असलेल्याच ठिकाणी कार्यरत राहतील.

०५. श्री. का. श. दिवेकर यांना संदर्भाधीन क्र. १ आदेशान्वये देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती या आदेशान्वये रद्द करण्यात येत असून मुख्याधिकारी गट-ब या पदावर नियुक्ती करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,**

(आय. एम. मोरे)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

२) मा. राज्यमंत्री (नवि) महोदयांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
४) संबंधीत विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपरिषद प्रशासन,
५) संबंधीत जिल्हाधिकारी
६) संबंधीत आयुक्त महानगरपालिका
७) सर्व संबंधीत मुख्याधिकारी
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
१०) सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १२/ कार्यासन १६-ब
११) प्रधान सचिव यांचे स्टाफ ऑफिसर, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१२) नवि-१५, १७, १८, १९, २३ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१३) निवड नस्ती/नवि १४